"हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करणेबाबत."

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०१९/१९२/प्र.क्र.४९/टेक्स-३

नविन प्रशासन भवन, १४ वा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :**

१) शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र.सीटीएस-१०७२/३७९५/सी २(१), दिनांक ५.१०.१९७२.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.हातमाग-२०१८/प्र.क्र.९७/टेक्स-३, दिनांक २९ सप्टेंबर, २००८.
३) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. हातमाग-२०१५/प्र.क्र.१४७/टेक्स-३, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१६ व शासन शुध्दीपत्रक, दिनांक १८.१.२०१७.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९.
५) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-५/ब-३१९/ बक्षिस/ ४१८९/२०१९, दिनांक २८ मे, २०१९.

**प्रस्तावना :**

राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देण्याकरीता व विणकरांनी उत्पादित केलेल्या उत्कृष्ट वाणाला वाव मिळावा या दृष्टिकोनातून महाराष्ट्र शासनाकडून सन १९७२-७३ पासून राज्यातील हातमाग विणकराद्वारे उत्पादित कापडाचे उत्कृष्ट नमुन्यासाठी हातमाग कापड स्पर्धा व बक्षिस योजना राबविण्यात येत आहे. दिनांक १७.१०.२०१६ रोजीच्या वस्त्रोद्योग विभागाच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची पुर्नरचना करण्यात आली असून बक्षिसाच्या रकमेतही वाढ करण्यात आलेली आहे व त्याचा वार्षिक आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे.सन २०१९-२० मध्ये बक्षिस योजना राबविण्याकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीतून निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव वस्त्रोद्योग आयुक्तालयाच्या वर नमूद दिनांक २८ मे, २०१९ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदर योजनेसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

" मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) (५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१०११९) ०५ बक्षिसे " या लेखाशिर्षाखाली रु.३,६०,०००/- (रु.तीन लाख साठ हजार

फक्त) इतकी रक्कम सन २०१९-२० साठी मंजूर निधीतून वितरीत करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रु. ३.६० लाख इतका निधी विणकरांच्या स्पर्धेच्या आयोजनासाठी व बक्षिस वितरणासाठी वितरीत करण्यासाठी सहायक संचालक (लेखा), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना या योजनेसाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात येत आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८ जूलै, २०१९ अन्वये वित्तीय वर्ष सन २०१९-२० च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर २०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांअंतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% मर्यादेत खर्च करण्यास परवानगी देण्यात आली आहे. तथापि राज्यातील हातमाग विणकरांना प्रोत्साहन देण्याकरीता व विणकरांनी उत्पादित केलेल्या उत्कृष्ट वाणांना वाव मिळावा या दृष्टीकोनातून सदर योजना राबविण्याकरीता वित्त विभागाने अर्थसंकल्पित रु. ४.५० लाख इतक्या निधीच्या ८०% निधी वितरीत करण्यास दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सन २०१९-२० या वर्षात “मागणी क्रमांक व्ही-२” अंतर्गत -२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) (५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१०११९) ०५ बक्षिसे " या लेखाशिर्षाखाली रु.४.५० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ८०% म्हणजे रु. ३,६०,०००/- (रु.तीन लाख साठ हजार फक्त) इतका निधी डिसेंबर, २०१९ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध असून सदर संपूर्ण निधी अखर्चित आहे.

५. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.२ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणी सूचीतील मुद्यांचीही पूर्तता होत आहे.

६. सन २०१९-२० मध्ये ह्या योजनेंतर्गत अद्याप कोणताही निधी वितरीत करण्यात आलेला नाही. या योजनेच्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

७. वैयक्तिक लाभार्थ्यांची देयके आहरीत करतांना लाभार्थ्यांची यादी निश्चित करुन योग्य त्या तपशिलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरीत करण्यात येवू नयेत. शक्यतो अश्या लाभार्थ्यांचे आधार क्रमांक पण नमूद करावेत.

८. या योजनेचा निधी खर्च करतांना वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच यासंबंधी शासनाच्या मार्गदर्शक सूचना व नियमांचे पालन कटाक्षाने करण्यात यावे.

९. स्पर्धेअंती विजेत्या हातमाग विणकरांना द्यावयाची बक्षिसे तसेच आयोजनाकरीता करण्यात येणा-या खर्चाची देयके संबंधितांच्या बॅक खात्यात ECS द्वारे थेट जमा करण्यात यावी.

१०. यावरील खर्च " मागणी क्रमांक व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) (५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१०११९) ०५ बक्षिसे " या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

११. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

१२. सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८ जूलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५०८/व्यय-२, दि.५.१२.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१५१२२३१५२६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gauri Rahul Mhaske

Digitally signed by Gauri Rahul Mhaske
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e3b06f24c3c5bb026c414c42f865f39144c21fb0f8c3a69c8e6e8dc2c5bb9ddd, serialNumber=b018ba858dd6b20cc7a84f6bc86a86d6a6e9ac3ac56c5dbfcd89f36c74de3e1f, cn=Gauri Rahul Mhaske
Date: 2020.02.15 12:24:47 +05'30'

**( गौरी म्हस्के )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
८. प्रादेशिक उपआयुक्त (वस्त्रोद्योग), मुंबई/नागपूर/औरंगाबाद/सोलापूर.
९. निवड नस्ती ( टेक्स-३).